परिवहन कार्यालयांजवळ २५० मीटर लांबीचे ब्रेक टेस्ट ट्रॅक उभारण्यासाठीच्या खर्चास मंजूरी देण्याबाबत........

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-१०१६/प्र.क्र.४८०/परि-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- ०४ फेब्रुवारी, २०१७

**वाचा :-**

१) परिवहन आयुक्त यांचे पत्र क्र. पआका/का-१५/हिवाळी पुरवणी मागणी/२०१६-१७/जा.१७३८४, दिनांक २५.१०.२०१६ चे पत्र.
२) शासन ज्ञापन क्र.एमव्हीडी-१०१६/प्र.क्र.४७६/परि-४,दिनांक १०.११.२०१६
३) वित्त विभाग परिपत्रक क्र.पूरक-२०१६/प्र.क्र.२०१/अर्थसंकल्प-३, दिनांक ०४ जानेवारी, २०१७.

**प्रस्तावना:-**

जनहित याचिका क्र.२८/२०१३ श्रीकांत कर्वे विरुध्द महाराष्ट्र शासन या याचिकेमध्ये मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी दि.१८.०२.२०१६ रोजी परिवहन आयुक्त कार्यालयाने परिवहन कार्यालयांजवळ २५० मीटर लांबीचे ब्रेक टेस्ट ट्रॅक उभारण्याचे आदेश दिले आहेत. वार्षिक योजना २०१६-१७ करिता (२०४१ ०३२१) कृत्रिम चाचणी पथ बांधणे या योजनेंतर्गत रु.१ लक्ष इतकी नाममात्र तरतूद करण्यात आली होती. मा.उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार ब्रेक टेस्ट ट्रॅक उभारणे अनिवार्य असल्याने व सदर कामांकरिता निधीची आवश्यकता असल्याने प्रशासकीय मान्यता प्राप्त झालेल्या परिवहन कार्यालयांच्या ठिकाणी ब्रेक टेस्ट ट्रॅक उभारणीच्या अनुषंगाने निविदा प्रक्रिया सुरु करण्यासाठी १०% इतक्या रकमेची तरतूद तातडीने करण्याकरिता संदर्भाधीन क्र.२ दिनांक १०.११.२०१६ च्या ज्ञापनान्वये आकस्मिकता निधीतून रु.८४,७८,०००/- इतका निधी उपलब्ध करुन देण्यात आला आहे. सदर आकस्मिकता निधीची भरपाई करणे व प्रशासकीय मान्यता प्राप्त प्रादेशिक/उपप्रादेशिक परिवहन कार्यालयांजवळ ब्रेक टेस्ट ट्रॅक उभारण्याकरिता येणा-या खर्चासाठी रु.७,८३,००,०००/- इतका निधी उपलब्ध होण्यासाठी डिसेंबर २०१६ च्या अधिवेशनामध्ये पुरवणी मागणी सादर करण्यात आली होती. त्यानुसार आकस्मिकता निधीच्या भरपाईसाठी रु.८४,७८,०००/- आणि रु.७,८३,००,०००/- ची अतिरिक्त तरतूद यांचा समावेश असलेली रु.८,६७,७८,०००/- च्या पुरवणी मागणीस मान्यता मिळाली आहे. त्यापैकी आकस्मिकता निधीव्दारे मंजूर झालेली रु.८४,७८,०००/- इतकी रक्कम यापुर्वीच वितरीत केली असल्याने रु.७,८३,००,०००/- इतका निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

वार्षिक योजना सन २०१६-१७ या आर्थिक वर्षामध्ये परिवहन कार्यालयांजवळ मा.उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार २५० मीटर लांबीचे ब्रेक टेस्ट ट्रॅक उभारण्याकरिता रु.७,८३,००,०००/- इतका निधी (२०४१ ०३२१) या लेखाशीर्षाअंतर्गत दि.३१ मार्च,२०१७ पर्यंत सदर निधी खर्च करण्याबाबत दक्षता घ्यावी या अटींच्या अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

यासाठी येणारा खर्च सन २०१६-१७ या आर्थिक वर्षामध्ये "मागणी क्र. बी-३, २०४१, वाहनावरील कर, (००) ००१, संचालन व प्रशासन (०१) परिवहन आयुक्त (०१)(०६) वाहन चालविण्यासाठी चाचणी घेताना गुणात्मक वाढ करण्याकरिता पायाभूत सोयीमध्ये दर्जावाढ करणे, कृत्रिम चाचणी पथ बांधणे (२०४१ ०३२१) (योजनांतर्गत) या लेखा शिर्षाखाली उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

सदर आदेश, नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१७/१४६१, दि.१३.०१.२०१७ व वित्त विभागाच्या क्रमांक.३९२१०१/व्यय-८, दि.२१.०१.२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२०२१६४६०३०८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Tikamdas N Shikharame

Digitally signed by Tikamdas N Shikharame
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Tikamdas N Shikharame
Date: 2017.02.04 13:53:32 +05'30'

**( टि.न.शिखरामे )**
कार्यासन अधिकारी,गृह (परिवहन) विभाग

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, यांचे खाजगी सचिव
२. मा.मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
४. मा.प्रधान सचिव परिवहन यांचे स्वीय सहायक
५. महालेखापाल (लेखापरिक्षा)/ (लेखा वअनुज्ञेयता) महाराष्ट्र, १, मुंबई
६. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. परिवहन उप आयुक्त (प्रशासन / लेखा), परिवहन आयुक्त कार्यालय,मुंबई
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१०. अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग.
११. निवड नस्ती, परि-४